# जाहीर लिलाव - ग्रामसभा पाचगाव

ग्रामसभा पाचगाव ला सामुहिक वन हक्काचा दावा मिळून एक वर्षाचा कालावधी होत आला आहे. या दरम्यान ग्रामसभा पाचगाव ने आपल्या जंगलाचे सरंक्षण, संवर्धन व व्यवस्थापन सुरळीत चालू ठेवले, जंगलात मोठ्या प्रमाणात बांबू आहे, पण या बांबूची प्रत्यक्ष कटाई करून विक्री करता येत नव्हती त्यामध्ये ब-याच अडचणी होत्या त्या पूर्ण करताना जवळपास सहा महिन्याचा कालावधी लागला होता. अडचणी पूर्ण करण्यासाठी बराच संघर्ष करावा लागला आहे ते सविस्तर पुढे सांगूच सध्या पहिल्या लिलावाचा अनुभव आपल्या सर्वां सोबत आम्ही देवान घेवाण करतोय, ग्रामसभा पाचगाव ने सर्वात पहिले आपल्या ग्रामसभा पाचगाव चे नियम बनवून घेतले व नियमांची अमलबजावणी सुरु केली.



त्यानंतर लक्षात आले कि आपल्या जंगलातील बांबू ची वनविभागाने कार्यायोजना तयार केली नाही त्यामुळे ग्रामसभा पाचगाव ला बांबू कटाई करणे शक्य नाही. वन विभागाने कार्ययोजना तयार करणे सुरु केले व त्याला दोन वर्ष लागतील त्यामुळे ग्रामसभेने स्वताची बांबू ची कार्ययोजना तयार करून त्याला ग्रामसभेत मान्यता दिली व त्यानुसार आपली श्रमदानातून बांबू कटाई सुरु केली. पहिल्या टप्यात लांब बांबू ६७६५ व बांबू बंडल ५०० तोडले. त्यानंतर ग्रामसभा पाचगाव चे अभिलेख जोडपत्र-३ जिल्हाधिकारी चंद्रपूर यांच्या कडून दुरुस्त करून घेतले. ग्रामसभा पाचगाव च्या नावाने  पॅन कार्ड व टॅन कार्ड काढले. आता बांबू ची विक्री टेंडर काढून करायची कि जाहीर लिलाव करायचा असा प्रश्न पडला यावर सर्वांनी बराच विचार व अभ्यास केल्यानंतर सर्वाना वाटले कि आपण स्वता बांबू ची कटाई करायची, स्वता च्या जबाबदारीवर, पगार झाला नाही तरी हरकत नाही, माल विकल्या गेला नाही तरी हरकत नाही पण हा पहिला प्रयोग करून बघायचे असे एकदा ग्रामसभेत ठरले व तसा ठराव झाला आणि जाहीर लिलावाची तारीख ठरली २६ एप्रिल २०१३.

जसे सामुहिक वन हक्क १४ एप्रिल २०१२ ला संघर्ष करून मिळवले तसेच योगायोगाने एका स्थानिक डेकोरेशन वाल्याला ४० रुपये दराने ५० बांबू ही १४ एप्रिल २०१३ लाच विकून हक्काने बांबू विक्रीचा शुभारंभ झाला आणि जाहीर लिलावाची पुढची वाटचाल सुरु झाली.

शहर/ग्रामीण

३ रविवार दि. २१ एप्रिल २०१३ — लोकमत Hello चंद्रपूर

## ग्रामसभा पाचगाव

## संक्षिप्त विक्री सूचना

**ग्रामसभा पाचगाव ठराव क्रमांक 06**
**दिनांक : 7/4/2013**

सर्व साधारण माहिती करिता सूचित करण्यात येते की, ग्रामसभा पाचगाव ठराव क्रमांक 06 दिनांक 7/4/13 जो पाचगाव ग्रामसभेमध्ये संमत झाला आणि अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्क मान्य करणे) अधिनियम 2006 व नियम 2008 अंतर्गत ग्रामसभा पाचगावच्या आगारात दिनांक 26-04-2013 रोजी लांब बांबू व बांबू बंडल मालाचा जाहीर लिलाव ठेवण्यात येत आहे. लिलावात विक्रीसाठी ठेवण्यात आलेल्या वनोपजाचा तसेच अटी व शर्तीचा तपशील ग्रामसभा पाचगावच्या कार्यालयात उपलब्ध आहे. ग्रामसभा पाचगाव हे कोठारी वनपरिक्षेत्र, मध्य चांदा वनविभाग, चंद्रपूर महाराष्ट्र राज्य मध्ये मोडते.

तरी इच्छुक बोलीदारांना विनंती करण्यात येते की, त्यांनी जाहीर लिलावात भाग घ्यावा. लिलावासाठी ग्रामसभा पाचगाव ने ठरविलेल्या लिलाव विक्री नियमक, विक्रीच्या शर्ती व अटी बोलीदारांना बंधनकारक राहील.

| आगाराचे नाव व स्थळ | लिलावाची तारीख व वेळ | मालाचा तपशील |
|---|---|---|
| ग्रामसभा पाचगावचे आगार, ग्रामसभा पाचगाव हे कोठारी वनपरिक्षेत्र, मध्य चांदा वनविभाग, चंद्रपूरमध्ये मोडतो. | दिनांक 26-04-2013 सकाळी 11.00 ते सा. 6.00 वाजेपर्यंत | नवीन लांब बांबू अंदाजे 20,000 व बांबू बंडल अंदाजे 2000 |

मोबाईल क्रमांक : 7350633420, 8412929902, 9404101795
(टिप : पाचगाव हे कोठारी वरुन 12 km तोहोगांव मार्गावरती आहे.)

**ग्रामसभा पाचगाव**
**पोष्ट. तोहोगाव, तह. गोंडपिपरी**
**जिल्हा चंद्रपूर, पिन नं. ४४२ ७०१**

लिलावाची सर्व तयारी केल्यावर आम्ही शेवटच्या टप्प्यात आलोय दि. २५/०४/२०१३ पाचगाव मध्ये आम्ही सकाळी ११.०० वाजता सचिन पिपरे, प्रणाली येरोजवार व सुनैना पिपरे आणि गावातील काही लोक मिळून डेपो वरती गेलो. डेपो वरचे बाकी लोकं आपली कामे सुरळीत पार पाळत होती. त्यामधे बांबू बंडल व लांब बांबू वेगळे करणे व त्याचे लाट पाडण्याचे काम अंतिम टप्प्यात सुरु होते. काही व्यक्ती जंगलातील उर्वरित बांबू आणण्याकरिता जाऊन होते अश्या प्रकारे गावातील सर्वच लोकांना कोणती ना कोणती कामे ग्रामसभे मध्ये सोपवली गेली होती. काही व्यक्ती झाडाच्या खाली हिशोब करत होते.



लांब बांबू किती कमी आले व बांबू कापून किती झाला अशी चर्चा सुरु होती त्यामधे ५० बांबू डेकोरेशन वाल्याला विकले व ते हिशोबा मधून सुटून गेले हे लक्षात आल्यावर ती चूक दुरुस्त करण्यात आली. प्रत्येक लाट मध्ये किती लांब बांबू ठेवले आहेत ते डबल मोजून काढण्यात आले व लाट मधील बांबू ची संख्या निचित करण्यात आले त्यामुळे डेपो मध्ये २२८१३ लांब बांबू जमा झाले हे कळले आहे व त्याचा हिशोब करण्यात आला जंगलातून आलेला बांबू व डेपोमध्ये जमा झालेला बांबू यांचा मेळ जुळवून पाहण्यात आला त्यात गावातील सुपरवाईझर, प्रणाली, सचिन व गावातील तीन सदस्यांचा समावेश होता.

हे सर्व कामे करत असतानांच मधातच पाऊस आला त्यामुळे डेपो वरचे सर्वच लोक गावाकडे गेले. काम मधातच थांबेल कि काय असे वाटत होते सध्या अधून मधून खूप वारे वाहून पाऊस येतो त्यामुळे या हवामानाचा परिणाम लिलाव या प्रक्रीयेवरती होवू नये असे वाटत होते. सध्या याच बरोबर आपले काय काय चुकले याचीही लोकामध्ये आपसात चर्चा सुरु होती जसे ट्रक्टर किती लावायला पाहिजे होते व आम्ही एकच लावली होती त्यामुळे

बांबू हा जंगलातच राहीला असता त्यामुळे वेळेवरच आम्ही परसोडीची ट्रक्टर बोलावल्या मुळे जंगलातील बांबू हे डेपोवर आणल्या गेले.



पाऊस थांबल्यावर परत डेपो वरती जाऊन लाट लावण्याचे काम सुरु झाले व सर्व त्याचे दस्ताऐवज तयार करून रात्रो मिटिंग ला बसलोय रात्री ८.३० वा ग्रामसभा सुरु होण्याची  घंटा वाजली आणि मिटिंग सुरु झाली. लोक चर्चा करू लागले चौकीदार किती दिवस होते, त्यांना किती रोजी दिल्या जाते, मजुरांनी बांबू चांगला तोडला नाही, श्रमदानातील बांबू हा चांगला तोडला आहे असे लोकांचे मत मांडण्यात आले, आपल्या चुका काय काय झाल्या पुढे त्या आपल्याला दुरुस्त करायचे अश्या प्रकारे चर्चा सुरु झाली मग लोकांनी प्रश्न विचारले कि उद्या लिलाव आहे व आपल्या बांबू ची किमत ठरवायची आहे त्यात लांब बांबूची किमत किती व बांबू बंडल ची किमत किती अशी वेगवेगळ्या लोकामधून वेगवेगळे आकडे निघत होते व सर्वांचे एकमत झाल्यावरती बांबूची किमत नोंदवही भरण्यात आली. लिलावामध्ये कोणाकोणा कडे कोणती जबाबदारी असेल याचे वाटप करण्यात आले. आणि उद्याचा अनुभव घ्यायचे असे ठरविण्यात येऊन मिटिंग संपली.

दि. २६.४.२०१३ ला सकाळी आम्ही ९ वाजता, स्मिता कांबळे, प्रवीण ताकसांडे, सचिन पिपरे, प्रणाली येरोजवार, सुनैना पिपरे पाचगाव मध्ये गेलो. तरुण मुलांनी रोडवर व इत्तर ठिकाणी ग्रामसभा पाचगाव आपले सहर्ष स्वागत करीत आहे असे बनर लाऊन तरुण मुले लिलावासाठी सज्ज झालीत.



इत्तर लोकांनी लिलाव चिंचेच्या झाडाखाली करायचा असल्यामुळे जागा स्वच्छ करून टेबल खुर्च्या लाऊन आपली बैठक व्यवस्था निश्चीत केली. सकाळीच काही ठेकेदारांचे दिवाणजी येऊन मालाची तपासणी करीत होते मालाची लांबी, गोलाई मोजून माल खात्रीदायक आहे कि नाही हे गट यादी प्रमाणे बघत होते.

ठेकेदार लीलावांसाठी येणार कि नाही अशी चिंता वाटत होती, मनात अनेक प्रश्न होते जर ठेकेदार लिलावासाठी उत्तरले नाहीत तर एवढी सर्व मेहनत वाया जाईल. जसे प्रश्न पडत होते तसे उत्तर हि शोधण्यासाठी पुढचा प्रवास सुरु होईल असे वाटत होते. काही वेळेनंतर चिंचेच्या झाडाजवळ ठेकेदार एक एक करून जमा झाले. आणि मनातल्या प्रश्नांना पूर्ण विराम मिळाला. सर्वात प्रथम ठेकेदाराना बोली बोलायची असेल तर त्यांनी अनामत रक्कम मणून १००० रु. भरल्या नंतरच बोली बोलता येते नाही तर ठेकेदाराला बोली बोलता येणार नाही असे ग्रामसभेच्या सदस्यांनी ठेकेदारांना समजावून सांगितले. माल विकत घेतल्या नंतर कोण कोणते टॅक्स जसे आयकर व वॅट किती टक्के भरावा लागेल याची माहितीही ग्रामसभे तर्फे देण्यात आली. एकूण लिलावासाठी पाच ठेकेदार आले होते त्यानाही काही प्रश्न होते ते ती विचारत होते जसे टी.पी. कोण देणार, जागेवरच्या मालाची जबाबदारी कोणाची, त्यांच्या प्रश्नाचे समाधान ग्रामसभेचे सदस्य करीत होते, अनामत रक्कम भरून झाल्यावर व सर्व ठेकेदारांच्या प्रश्नाचे समाधान झाल्यावर प्रत्यक्ष लिलावाला सुरवात झाली.





ठेकेदारांनी बोली बोलण्यास सुरुवात केली लांब बांबू ची बोली ठेकेदाराकडून कमी लावण्यात येत होती, ग्रामसभा पाचगाव ला ती बोली कमी वाटत होती मणून ज्याच्याकडे लिलावाची बोली बोलण्याची जबाबदारी ग्रामसभेने दिली होती तो व्यक्ती बोली मान्य करीत नव्हता अश्या प्रकारे लांब बांबूचा लिलाव विड्रान करण्यात आला. त्यानंतर ठेकेदार बांबू बंडल कडे वळले व 500 बांबू बंडल साठी १८००० रु. बोली लावली, ती बोली परवडत असल्यामुळे बोलीदाराची बोली मान्य केली. दुस-या डेपोवरती सुद्धा लांब बांबू ना योग्य किमंत ठेकेदार देत नसल्यामुळे ग्रामसभा पाचगाव ने लांब बांबू चा लिलाव विड्रान केला. मग ग्रामसभेने बांबू बंडल चा लिलाव सुरु केला बोलीदारांनी २७०० बांबू बंडल साठी ८५००० रु.पर्यंत बोली बोलली होती पण ती बोली ग्रामसभेला परवडत नव्हती म्हणून बोली मान्य केली नाही त्यामुळे ठेकेदार निघून गेले व डेपो वरती लोकांची चर्चा सुरु झाली कि हे ठेकेदार मिळून आले, ते जास्त बोली बोलत नव्हते, आपण ६ वा. पर्यंत वाट बघू असे ठरविण्यात आले आम्ही जेवण करण्याकरिता गेलो तिथे चर्चा करत असताना

अजून ठेकेदार आले असे कळले व आम्ही सर्वच तिथे गेलो आलेले ठेकेदार डेपोवर गेलेत असे माहित झाले आम्ही तिथेच वाट पाहत होतो त्या ठेकेदाराला मजबूत बांबू पाहिजे होते. डेपो वरचे



बांबू ची छाटणी बरोबर झाली नव्हती असे ठेकेदारांनी बांबू विषयी माहिती दिली व तुमचे बांबू शेतीच्या कामासाठी व चांगल्या प्रकारे बांबू काढल्यास तो घर बांधनिच्याही कामाला येईल अश्या प्रकारचा सल्ला दिला. सर्वच ठेकेदारांनी आमचे काय चुकले होते ते सांगत होते ते ज्या चुका सांगत होते ते चुका आम्हा सर्वांना आदल्या दिवशी लक्षात आल्या होत्या आता त्यामुळे खात्री झाली कि आमचे तिथेच चुकले होते. हि सर्व प्रक्रिया आमच्या सर्वासाठी अगदी नवीन होती यातले काही एक माहित नव्हते पण आम्ही ते वन विभागातील काही चांगल्या लोकांकडून शिकून घेतलोय व काही स्वतः नवीन प्रयोग करीत होतोय. केलेल्या चुका समजने फार आवश्यक होते जेणे करून पुढची वाटचाल सोपी होईल असे वाटत होते आणि त्यातून कडले कि आपले बाकी सर्व ठीक होते फक्त लाटिंग चुकली होती ती दुरस्त केल्यावर सर्व ठीक होईल.एकोणीस दिवस काम केल्यावरती ग्रामसभेच्या कोणत्याही सदस्याचा पगार झाला नाही व लिलावातून जे पैसे येतील त्यातूनच पगार करायचा हे ठरले होते. लिलाव विड्रान झाला याचे कोणाच्याही चेह-या वरती दुःख दिसत नव्हते उलट या प्रक्रियेतला शेवटचा टप्पा गाठला याचा आनंद दिसत होता. रात्री ग्रामसभा परत बसली सर्व बाबींचा विचार केल्यावर ठेकेदाराची ८५०००.०० रुपयाची बोली मान्य करायची असे ठरले व त्यांना तसे निरोप देण्यात



आले अश्या प्रकारे ग्रामसभा पाचगाव ने पहिल्या टप्प्यात ३२०० बांबू बंडलचा जाहीर लिलाव करून १,०३,०००.०० रुपयाचे उत्पन्न प्राप्त केले. लोकांचे अधिकार जंगलावरती असले पाहिजे यासाठी जि सामुहिक वन हक्काची प्रक्रिया दि. १७.१२.२००९ पासून सुरु झाली त्यात १४ एप्रिल २०१२ ला बळ मिळाले तिचे एक वर्तुळ २६.०४.२०१३ रोजी पूर्ण झाले. लोकशाही प्रत्यक्ष जमिनीवर उत्तरविली यांचा आनंद गावातील लोकांना फार वेगळा वाटत होता. विड्रान झालेल्या लांब बांबू मालाचा जाहीर लिलाव करण्यासाठी दि. १४ मे २०१३ हा दिवस निवडून ग्रामसभा पाचगाव पुढच्या प्रवासाठी परत सज्ज झाली.

१४ मे ला विड्रान झालेल्या लांब बांबू च्या लीलावा साठी स्थानिक वृतपत्रा मध्ये जाहिरातीचे दर कमी असल्यामुळे यावेळी जाहिरात स्थानिक वृत्तपत्रात दिल्या गेली. आता फारसी तयारी काही करायची नव्हती. पाचगाव ने ठरविलेल्या लिलाव विक्री नियमक, विक्रीच्या शर्ती व अटी, बोली पत्रक, अनामत जमा रक्कम पावती बुक, संक्षिप्त विक्री सूचना, जाहिरातीचा मसुदा ई. ग्रामसभा पाचगाव ने मागील लिलावाच्या पूर्वी बनवून तयार केले होते. १३ मे ला विड्रान गट यादी( लांब बांबू) तयार केल्या गेली. ठरल्या प्रमाणे सायंकाळी ग्रामसभेची बैठक झाली त्यामध्ये बराच अभ्यास करण्यात आला. मागच्या लिलावाचा अनुभव लक्षात घेऊन बांबू विषयीची चर्चा झाली. १४ मे उजाळला सकाळी ११.०० वाजता स्थानिक ठेकेदार लीलावासाठी आलेत. अनामत जमा रक्कम पावती भरून झाल्यावर बोली बोलायला सुरुवात झाली. बोली बोलण्यासाठी ची जबाबदारी श्री. संजय बोपनवार कडे होती त्यांनी बोलीचा पुकारा केला आणि ठेकेदार बोली बोलू लागले. लांब बांबू चा रेट आल्यावर ज्याची बोली ज्यास्त होती त्याला एक, दोन,तीन म्हणून अंतिम करीत होते. अश्या प्रकारे यावेळी सर्वच बांबू विकल्या गेला, गट क्रं. 7 चा लाट ४२२ बांबू चा होता याला रेट बरोबर न आल्यामुळे हा लाट ग्रामसभेने विड्रान केला. शेवटी बोली पत्रकावर खरेदी करना-यांच्या सह्या घेऊन व एकूण बोलीच्या रक्कमेच्या १६ टक्के रक्कम घेऊन ग्रामसभा पाचगाव च्या खात्यात जमा करण्यात आली अश्या प्रकारे लांब बांबू चा जाहीर लिलाव पूर्ण झाला.

लांब बांबू व बांबू बंडल कटाई १९ दिवस केली त्यातून मिळालेल्या लाभाचे प्रमाण पुढील प्रमाणे आहे.

**<u>ग्रामसभा पाचगाव चे बांबू पासून चे उत्पन दि. ०१.०४.२०१३ ते १९.०४२०१३ पर्यंत चे</u>**

| **लांब बांबू कटाई** | **लांब बांबू विक्री** | **बांबू बंडल कटाई** | **बांबू बंडल विक्री** | **विक्री द्वारे प्राप्त रक्कम** | **१८ % दंड** | **T.C.S.** | **एकूण रक्कम प्राप्त** |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २९६२८ | २९२०६ | - | - | ३७८५०० | ४५३ | ९८२४ | ३८८७७६ |
| - | - | ३२०० | ३२०० | १०३००० | १८९ | २५८० | १०५७६९ |
| | | | | **४८१५००** | **६४२** | **१२४०४** | **४९४५४६** |

<u>खर्च</u>

| **अ.क्रं.** | **तपशील** | **रक्कम** |
|---|---|---|
| १. | बांबू कटाई मजुरी खर्च | १६०९१५ |
| २. | बांबू वाहतूक खर्च | २५९७१ |
| ३. | साहित्य खर्च, प्रथोमपचार खर्च | ६८६२ |
| ४. | जाहिरात खर्च | ११०४० |
| 5. | आयकर | १२५९७ |
| 6. | चार्टर अकौंटट चार्ज | २९५० |
| **एकूण खर्च** | | **२२०३३५** |



अश्या प्रकारे कायद्याचा बारीक अभ्यास व शांतता आणि अहिंसाच्या मार्गाने गावातील लोकांनी कायद्याची अंमलबजावणी प्रशासना कडून करून घेतली. त्यामुळे गावातील लोकांना गावातच रोजगार मिळाला व रोजगाराच्या माध्यमातून उत्पन्न हि प्राप्त झाले. खर्च वजा जाता रु. २,७४,२११.०० एवढा नफा मिळाला. ग्रामसभेने हा नफा जंगलाच्या विकासासाठी व गावाच्या सर्वांगीण विकासासाठी करावयाचे ठरवले असून तसे नियम हि तयार केले आहेत. गावात ७२ टक्के अनु. जमाती व २८ टक्के इत्तर पारंपारिक वन निवासी असे ६१ कुटुंब आहेत. ज्याची लोकसंख्या २४२, ज्यामध्ये १२० महिला व १२२ पुरुष यांनी मिळून प्रशासना सोबत निवळ अभ्यास आणि पत्र व्यवहार करून आपल्या हक्काचा प्रवास सुरु ठेवला आहे. प्रत्येक वेळी अडचण आली, पण या अडचणींना घाबरून न जाता अडचणींचे ताकतीत रुपांतर सर्वांनी मिळून केले, असे काम कोणत्याही गावात घडू शकते फक्त गरज आहे रात्रो अभ्यास करण्याची व दिवसा काम करण्याची...............

**विजय देठे**

**पर्यावरण मित्र**, विरूर (स्टे.)